**दत्तक विषयक योजनांच्या अंमलगजावणी व संनियंत्रणा करीता केंद्र शासनाच्या "कारा" मार्गदर्शक सूचना**

राज्यस्तरीय सल्लागार समिती स्थापन करणे बाबत.

2004071915322 5001-25(0)

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्र. जेजेए-१०९६/प्र.क्र. १३४/का-३

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १५ मार्च, २०००

**वाचा :**

सेंट्रल ॲडॉप्शन रिसोर्स एजन्सी (कारा) कल्याण संचालनालय, नवी दिल्ली यांची इंग्रजी पत्रे.

१. क्रमांक ४-१/९३ कारा, दिनांक ८.१.९६

२. क्रमांक ५-२/९६ कारा, दिनांक २२.२.९६

शासन निर्णय :- केंद्र शासनाच्या समाज कल्याण मंत्रालयातंर्गत, सेंट्रल ॲडॉप्शन रिसोर्स एजन्सी (कारा) या संस्थेने दिनांक २९.३.९५ च्या शासन आदेशान्वये दत्तक विधाना (Adoption) संबंधी सुधारित मार्गदर्शक सूचना केंद्र शासनाच्या राजपत्रामध्ये दिनांक २०.६.९५ रोजी प्रसिध्द केलेल्या आहेत. सदर सुधारित मार्गदर्शक सूचनामधील परिच्छेद ३.३ (५) अनुसार राज्यशासनास प्राप्त झालेल्या अधिकारास अनुसरुन दत्तक विधानाच्या कामकाजाच्या संबंधात खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव, महिला व बाल विकास विभाग | अध्यक्ष |
| २. | श्रीमती नजमा गोरीयावाला, इंडियन असोसिएशन फॉर प्रमोशन ऑफ ॲडॉप्शन ॲन्ड चाईल्ड वेलफेअर, मुंबई | सदस्य |
| ३. | श्रीमती लिना कश्यप, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई | सदस्य |
| ४. | श्रीमती शालीनी भरत, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई | सदस्य |
| ५. | श्रीमती निलिमा मेहता, फॅमिली सर्विस सेंटर, मुंबई | सदस्य |
| ६. | श्रीमती अर्मेटी देसाई, मुंबई | सदस्य |
| ७. | स्वयंसेवी समन्वय संस्था, मुंबईचे प्रतिनिधी Voluntary Co-ordinating Agency | सदस्य |
| ८. | आयुक्त, महिला व बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

सदर समितीचा कार्यकाल या शासन निर्णयाच्या दिनांका पासून पुढील ३ वर्षाकरीता राहील. समितीची तीन महिन्यातून एकदा बैठक होईल, सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

१. बालकांच्या कल्याणार्थ उपाय योजना, सुचविणे प्रामुख्याने मुलांचे देशांतर्गत दत्तक विधानाच्या (Adoption) कामास प्रोत्साहन देणे.

२. देशांतर्गत दत्तक विधानाच्या प्रचलनात्मक काम करण्याबाबत उपाय सूचविणे, शासनास सल्ला देणे.

३. दत्तक क्षेत्रात कार्यरत स्वयंसेवी संस्था (Placement Agency) स्वयंसेवी समन्वय संस्था (Voluntary Co-ordination Agency) तसेच क्षेत्रीय अधिकारी यांच्या देशांतर्गत व देशा बाहेरील दत्तक प्रकरणाचा आढावा घेणे व त्याच्या कामाचे संनियंत्रण करणे.

४. दत्तक विधानाचे कामकाज पध्दतीत सुलभता येण्याकरीता अस्तित्वात असलेले कायदे व योजनाचा विचार करुन, कार्यपध्दती मधील अडचणींचा परामर्श घेऊन त्यावर उपाय योजना सुचविणे

या समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या क्रमांक मुंविने १०९५/प्र.क्र.१२/९५ विनियम, दिनांक १५ जून, ९५ च्या शासन आदेशानुसार प्रवासभत्ता व बैठकभत्ता अनुज्ञेय राहिल. हा खर्च आयुक्त, महिला व बाल विकास यांनी त्यांच्याकडे प्रशासकीय खर्चासाठी उपलब्ध तरतूदीतून भागवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

( राजेंद्र शं. पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ लेखा परिक्षा, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
३. आयुक्त, महिला व बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. श्रीमती नजमा गोरीयावाला, इंडियन असोसिएशन फॉर प्रमोशन ऑफ अॅडॉप्शन अॅन्ड चाईल्ड वेलफेअर, मुंबई.
५. श्रीमती लिना कश्यप, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई.
६. श्रीमती शालीनी भरत, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई.
७. श्रीमती निलिमा मेहता, फॅमिली सर्विस सेंटर, मुंबई.
८. श्रीमती अर्मेटी.देसाई, मुंबई.

९. स्वयंसेवी समन्वय संस्था, मुंबईचे प्रतिनिधी (Voluntary Co-ordinating Agency).
१०. सर्व जिल्हा महिला बाल कल्याण अधिकारी.
११. सर्व मंत्रालयीन विभाग.
१२. सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
१३. उप [redacted], महिला व बाल विकास विभाग.
१४. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग.
१५. निवड नस्ती का. क्र.३.